**७ महाराष्ट्र पथक, राछासे, नाशिक या कार्यालयीन इमारत बांधकाम खर्चाचे अंदाजपत्रक व नकाशास सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राछासे २०१८/प्र.क.२९/ क्रीयुसे-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २२ सप्टेंबर, २०२१.

वाचा :- १) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,क्र.एनसीसी/१००३/(४५)२००३) माशि-७, दि. २८ मार्च, २००६

२) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र.एनसीसी/२०००/१०४६६/का-५/ ७१८४, दि. २० जानेवारी, २०२१

प्रस्तावना :

शिक्षण संस्थेतील माध्यमिक, उच्च माध्यमिक व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी सन १९४८-४९ मध्ये राष्ट्रीय छात्रसेना दलाची देशव्यापी स्वरुपात स्थापना करण्यात आली असून राष्ट्रीय छात्रसेनेची तरतूद व रचना करण्याच्या दृष्टीने "राष्ट्रीय छात्रसेना अधिनियम, १९४८" विहितकरण्यात आला आहे. राष्ट्रीय छात्रसेना योजनेसाठी केंद्र व राज्य शासनामार्फत निधी देण्यात येतो.

७ महाराष्ट्र बटालीयन, राष्ट्रीय छात्र सेना, नाशिक यांचे कार्यालय, सन १९५४ पासून कार्यान्वित असून सद्यस्थितीत ते एच.टि. पी. महाविद्यालय, नाशिक यांच्या इमारतीत भाडे तत्वावर सुरू आहे. सदर कार्यालयाच्या नवीन इमारत बांधकामासाठी रू. ०१,०८,२९,५१६/- च्या खर्चाच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र. १ येथील दि. २८.०३.२००६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. या बांधकामासाठी निधी मंजूर न झाल्याने बांधकाम सुरू झालेले नाही. सदर, इमारतीच्या बांधकामाच्या सन २०२०-२१ च्या दरसुचीप्रमाणे रू. १०,७१,४४,३४२/- च्या खर्चाचे अंदाजपत्रकास मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये सादर झाला आहे. सदर अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

७ महाराष्ट्र बटालीयन, राष्ट्रीय छात्र सेना, नाशिक यांचे कार्यालयाच्या इमारतीच्या बांधकामासाठी, **(प्रशासकीय इमारत, पार्किंग सुविधा, पाणी सुविधा, इक्ट्रिफिकेशन, ड्रेनेज, स्नानगृह, प्रसाधनगृह, पाकगृह, मोटार शेड, कंपाऊन्ड/फेन्सिंग, प्रवेशद्वार, अंतर्गत रस्ते, पंप हाऊस, रेन वॉटर हार्वेस्टिंग, जागेची किंमत,**

**धोबी घाट व वातानुकूलीत सभागृह इत्यादी)** अंदाजपत्रकाच्या रू. १०,७१,४४,३४२/- ( अक्षरी रूपये दहा कोटी एकाहत्तर लक्ष चव्वेचाळीस हजार तीनशे बेचाळीस फक्त) इतक्या रकमेस सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर बांधकामाकरीता आवश्यकतेनुसार महानगरपालिका व अन्य स्थानिक प्राधिकरणाची मंजूरी/नाहरकत प्रमाणपत्रे बांधकाम सुरू करण्यापूर्वी प्राप्त करण्यात यावीत.

३. सदर बांधकामाकरीता येणारा खर्च “४२०२, शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यावरील खर्च ०१ सर्वसाधारण शिक्षण-२०२ माध्यमिक शिक्षण (०४) शिक्षण उपसंचालक व शिक्षण विभागाच्या कार्यालय इमारतीचे बांधकाम (कार्यक्रम) ५३ मोठी बांधकामे ( ४२०२ ६२२८ )”या विभागाच्या लेखाशीर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. प्रत्यक्ष निधी वितरीत झाल्याशिवाय बांधकाम सुरू करण्यात येऊ नये.

४. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियमपुस्तीक-१९७८ ( सुधारीत ) सन २००९ मधील, भाग-पहिला व उप विभाग-पाच च्या परिच्छेद क्र. १३४ नुसार, प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२१०९२३११४४३२०६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने,

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e970 0fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db 4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2021.09.23 11:44:22 +05'30'

**( स्वाती म. नानल )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत :**

१. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अतिरिक्त महासंचालक, राष्ट्रीय छात्र सेना, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. महालेखापाल ( लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर
५. महालेखापाल ( लेखा), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर
६. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, नाशिक विभाग, नाशिक (संचालनालयामार्फत)
७. वित्त विभाग (व्यय-५)/ नियोजन विभाग (का. १४७१), मंत्रालय, मुंबई.
८. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. मा. मंत्री (क्रीडा) यांचे खाजगी सचिव.
१०. गटप्रमुख, गटमुख्यालय, राष्ट्रीय छात्रसेना. नाशिक
११. निवड नस्ती (क्रीयुसे- १ व २).